सन २०१५ हे वर्ष डिजिटाईज्ड कालबध्द सेवा वर्ष (२०१५ - Year of Digitized and Time- Bound Services) म्हणून साजरे करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

महसूल व वन विभाग

शासन परिपत्रक क्र. एफडीएम-२०१५/प्र.क्र. २४/फ-२

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- १९ जानेवारी, २०१५

परिपत्रक :-

मा. पंतप्रधान यांनी **"डिजिटल इंडिया कार्यक्रम"** देशभर राबविण्याचा निर्णय घेतला आहे. मा. पंतप्रधान यांच्या कार्यक्रमाला अनुसरुन राज्य शासनाने आगामी वर्ष २०१५ हे **"डिजिटाईज्ड कालबध्द सेवा - २०१५"** (२०१५ - Year of Digitized and Time- Bound Services) म्हणून साजरे करण्याबाबत जाहीर केले आहे. डिजीटल इंडिया कार्यक्रमातंर्गत महाराष्ट्राचे स्थान आघाडीवर राहण्याचे दृष्टीने मा. मुख्यमंत्री यांनी दि. २१ नोव्हेंबर, २०१४ रोजी सर्व संबंधितांची बैठक घेतली होती. सदर बैठकित माहिती व तंत्रज्ञान वापराच्या अनुषंगाने, राज्यातील नागरी सुविधांचा चेहरा मोहरा बदलणाऱ्या अनेकविध मुद्दयांवर सागोपांग चर्चा झाली. या बैठकीचे इतिवृत्त (Minutes of Meeting on E-Governance in Maharashtra and the way forward towards the implementation of the ambitious Digital India Program in the State ) महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध आहे. सदर इतिवृतात विविध निर्णयांच्या अंमलबजावणीसाठी कालमर्यादा आखून देण्यात आली आहे.

मा. मुख्यमंत्री यांनी घेतलेलया उपरोक्त बैठकीचे इतिवृत्त आणि यांच सदर्भातील अधिक सूचना वेळोवेळी माहिती व तंत्रज्ञान विभागाने सर्व विभागांना आणि क्षेत्रिय कार्यालयांना पाठविल्या आहेत.

राष्ट्रीय ई- गव्हर्नन्स प्रकल्प देशभर वेगाने राबविला जात आहे. सर्वसामान्य नागरिकांना गतीने, कार्यक्षमतेने आणि कालबध्द पध्दतीने विविध शासकीय सेवा मिळणेसाठी महाराष्ट्राने अग्रेसर राहून आपली ओळख निर्माण करावी अशी अपेक्षा आहे. त्यासाठी विविध विभागांना ह्यासंदर्भात दिलेल्या आदेशाची तात्काळ अंमलबजावणी व्हावी असे मा. मुख्यमंत्री ह्यांचे निर्देश आहेत. त्याच प्रमाणे ह्या कार्यक्रमाची व्यापक प्रसिध्दी आणि प्रसार होण्यासाठी शासना मार्फत वापरण्यात येणाऱ्या सर्व प्रकारचे लेटर हेड आणि लेखन सामुग्री यावर आवर्जून डिजिटाईज्ड कालबध्द सेवा - २०१५ (२०१५ - Year of Digitized and Time- Bound Services) हे घोषवाक्य वापरण्यात यावे, असेही मा. मुख्यमंत्र्यांचे आदेश आहेत.

वर नमुद केलेल्या निदेशांची कालमर्यादेत अंमलबजावणी होईल, याबाबत वन विभागातील सर्व अधिकारी / कर्मचारी यांनी योग्य ती काळजी घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१२७१५३७४५१७१९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vikas Shankar Kharage

Digitally signed by Vikas Shankar Kharage
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vikas Shankar Kharage
Date: 2015.01.27 17:59:07 +05'30'

( विकास खारगे )
सचिव (वने)

**प्रत**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३) अपर मुख्य सचिव (र.व का.) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
४) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) सचिव (माहिती व तंत्रज्ञान), मंत्रालय, मुंबई
६) खाजगी सचिव, मा. मंत्री (वने), मंत्रालय, मुंबई
७) संचालक (माहिती व तंत्रज्ञान), मंत्रालय, मुंबई
८) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
९) प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
११) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ, नागपूर
१२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा अतिरिक्त महासंचालक (प्रशासन), सामाजिक वनीकरण,
१४) महाराष्ट्र राज्य, पुणे
१५) मुख्य वनसंरक्षक तथा महासंचालक, सामाजिक वनीकरण (सर्व)

१६) उपसंचालक, सामाजिक वनीकरण (सर्व)

१७) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) सर्व

१८) वनसंरक्षक (सर्व)

१९) उप वनसंरक्षक (सर्व)

त्यांनी कृपया हे परिपत्रक खालील स्तरावरील वनरक्षक कार्यालयापर्यंत सर्वांच्या निर्दशनास आणावे.

**प्रत,**

वन विभागातील सर्व सह सचिव, विशेष कार्य अधिकारी

सर्व कार्यासन अधिकारी, मंत्रालय, ह्यांनी ह्याबाबत उचित कार्यवाही करावी.